वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट मांजरी (बु.), ता. हवेली, जिल्हा पुणे या संस्थेस साखर संशोधनासाठी सहाय्यक अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ससाका-२०१६/प्र.क्र.२०९/२५स,**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,

दिनांक: ६.३.२०१७

वाचा -

१) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका- १००९/१३७१/ प्र.क्र. १२ / २५स, दिनांक १७/६/२००९.

२) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका- १००९/प्र.क्र.१२६/ २५-स, दिनांक १८/८/२००९.

३) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र. अर्थसं - २०१५ / प्र.क्र. ८९/अर्थ-३,दि. २०.४.२०१६

४) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. ससाका- २०१६/प्र.क्र.२०९/ २५-स, दिनांक २९.१०.२०१६ व शुद्धिपत्रक दि.७.११.२०१६ .

५) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र. साआ / अर्थ ३/ कक्ष-६/ व्हीएसआय/ अनु. १७ / ७८६०, दिनांक ३.१.२०१७

## शासन निर्णय-

साखर संशोधनासाठी सहायक अनुदान यासाठी सन २०१६-१७ मध्ये उपलब्ध असलेल्या रु. ५,००,००,०००/- ( रुपये पाच कोटी फक्त ).तरतुदीपैकी ८० % म्हणजेच रु.४,००,००,०००/- (रुपये चार कोटी फक्त )वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.), ता. हवेली, जिल्हा- पुणे या संस्थेस अदा करण्यास शासन निर्णय दि. २९.१०.२०१६ अन्वये मंजूरी दिली आहे. आता वित्त विभागाच्या मान्यतेने अर्थसंकल्पित मंजूर निधीतील उर्वरित २०% तरतूद रु. १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त ) वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.), ता. हवेली, जिल्हा- पुणे या संस्थेस अदा करण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे. सदरहू निधीचा वापर करताना शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक ससाका- १००९/प्र.क्र. २६/२५ स, दिनांक १८ ऑगस्ट, २००९ अन्वये विहित करण्यात आलेल्या नियम व अटीचे पालन करणे बंधनकारक आहे. तसेच सदर रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने सदर अनुदानाचा संपूर्ण विनियोग केल्यानंतर सनदी लेखा परिक्षकाकडून प्रमाणित करुन हे वित्तीय वर्ष संपल्यानंतर परंतु, पुढील वर्षाच्या वितरणापूर्वी सादर करावे.

२. रु. १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त ) इतकी रक्कम "मागणी क्रमांक-व्ही-२, मुख्यलेखाशीर्ष-२४२५-सहकार,१०८ इतर सहकारी संस्थांना सहाय्य-(०३) सहकारी साखर कारखाने-, (०३)(०६) साखर संशोधनासाठी सहायक अनुदान (२४२५ १०४५), ३१, सहायक अनुदान " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा. सदर खर्च सन २०१६-१७ साठी मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी बु., ता. हवेली, जिल्हा - पुणे (VASANTDADA SUGAR INSTITUTE, MANJARI (BK.) TALUKA - HAVELI, DISTRICT-PUNE) या संस्थेस अनुदान म्हणून मंजूर

केलेली रक्कम रुपये १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त ) जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे यांचे कार्यालयामार्फत त्या संस्थेला वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. प्रमाणित करण्यात येते कि, या प्रकरणी शासन परिपत्रक ,वित्त विभाग , क्रमांक - अर्थसं-२०१५/ प्र.क्र.८९/अर्थ-३,दि. २०.४.२०१६ मधील संबंधित अटींची पूर्तता झाली आहे. तसेच वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक - संकीर्ण - २०१६ /प्र.क्र.३१/ कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६ मधील 'अ ' येथील बाबींची पूर्तता होत आहे. साखर आयुक्त,पुणे यांनी सदर तरतूद वितरीत करताना तसेच खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वित्त विभागाच्या दि. २०.४.२०१६ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

५. सदरहू शासन निर्णय वित्त विभाग , अनौचारिक संदर्भ क्र.१२७/१७ / व्यय २, दि. २७.२.२०१७ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०३०६१२३१५२०८०२** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2017.03.06 13:07:34 +05'30'

**( दि. शि. देसाई )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
२) प्रधान महालेखापरिक्षक, लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) महालेखापाल -१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) मुंबई.
६) महालेखापाल -२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) नागपूर.
७) संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
१०) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
११) वित्त विभाग (व्यय-२), कराधान-३ व अर्थसंकल्प-१२, (अर्थोपाय शाखा)
१२) महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.),ता. हवेली, जिल्हा - पुणे.
१३) अवर सचिव , १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सह संचालक, लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय इमारत,मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी, १६-स तथा वेब को-ऑर्डिनेटर,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती ( २५-स.)